ॐ श्रीगणेशाय नमः । शक्ती म्हणती आदिशक्तीप्रत । जगदंबिके आम्ही भाग्यवंत । म्हणोनि ऐकिलें माहात्म्य अद्भुत । मयूरक्षेत्राचें सिद्धिप्रद ।।१।। आतां देवेशि सांग आम्हांप्रत । मुद्गलें ज्यास उपदेशिलें ज्ञान पुनीत । ते शिवादि देव काय करित । कामासुरभयें संत्रस्त ।।२।। आदिशक्ति सांगे तयांसी । महाभाग मुद्गल जातां स्वगृहासी । योग्यांच्या गुरूस प्रणामासी । करून गेले देव तेव्हां ।।३।। मयूरक्षेत्रीं जाऊन । यात्रा करिती यथाशास्त्र विधान । सुरर्षि नंतर करिती भजन । सर्वही ते तपयुक्त ।।४।। एकाक्षरविधानें तोषविती । ते देव ऋषि विनायका भावभक्ति । तेव्हां त्यांसी वर देण्या प्रकटती । ढुंढिवेषें गजानन ।।५।। मयूरावरी आरूढ । पाहून विघ्नेश्वरासी प्रगूढ । देवर्षी करिती प्रणाम प्ररूढ । महाहर्ष चित्तांत ।।६।। परम भक्तीनें वंदून । विघ्नपा भावबळें पूजून । विष्णुमुख्य त्याचें करिती मनन । करांजली जोडूनियां ।।७।। मयूरेशासी सर्वसिद्धिप्रदासी । ज्ञानदात्यासी भक्तपालासी । स्वानंदवासीसी परात्परतरासी । ढुंढिराजा तुज नमन असो ।।८।। सर्वांच्या मातापित्यासी । अनादीसी सर्वांस पूज्यासी । परमात्म्यासी अनंतरूपासी । अनंत आननधरा नमन तुला ।।९।। सिद्धिबुद्धि प्रदात्यासी । सिद्धिबुद्धिवरासी । ज्येष्ठराजासी ज्येष्ठांस वरदासी । त्रिनेत्रा तुज नमन असो ।।१०।। चतुर्भुजासी कंजपाणीसी । महोदरासी सर्पेशवासीसी । मायाश्रयासी मायाचालकासी । विलासीसी तुज नमन असो ।।११।। ब्रह्माच्या ब्रह्मरूपासी । गणेशासी एकदंतासी । सर्वादि पूज्यासी सर्व मूर्तीसी । शूर्पकर्णा तुज नमन असो ।।१२।। योगासी शांतिदासी ।

पूर्वांगीं विष्णुरूपासी । दक्षिणांगीं शंकररूपासी । पश्चिमेस शक्तिदेहा नमन तुला ।।१३।। उत्तरेस भानुरूपासी । किती स्तुति करावी अशक्य आम्हांसी । वेद योगीही धरिती मौनासी । तेथ आमुचा काय पाड? ।।१४।। चित्त पंचविध असत । देवदेवेशा भ्रमात्मिका माया वर्तत । चित्रा मयूरसंज्ञा ती ज्ञात । हे तिच्या स्वामी वंदन तुजला ।।१५।। माया मयूराख्याच्या असत । तेथ क्रीडाकर्ता तूं जगांत । म्हणोनि मयूरेशनामें प्रख्यात । साक्षात् दिससी निःसंशय ।।१६।। तुझ्या अंघ्रीचें झालें दर्शन । धन्य जन्म धन्य ज्ञान । धन्य तप विद्यार्जन । आम्हीं झालों कृतकृत्य ।।१७।। ऐसी तयाची स्तुति करिती । प्रेमभरें ते नाचती । नयनांतून त्यांच्या वाहती । आनंदाश्रू त्या समयीं ।।१८।। शरीरीं रोमांच दाटले । जय मयुरेश ऐसे वदले। तेव्हां गणनाथ त्यांस म्हणाले । भक्तितुष्ट परम प्रसन्न ।।१९।। देवेशांनो मी प्रसन्न । मागा आतां वरदान । जें जें मागाल तें तें देईन । स्तोत्रतुष्ट मीं तुम्हांसी ।।२०।। तुम्हीं रचिलेलें हें स्तोत्र। मज आवडलें पवित्र । सर्वसिद्धिप्रद सर्वत्र । होईल पाठका श्रोत्यासी ।।२१।। पाठक श्रोता जें जें इच्छित । तें तें सर्व त्यास लाभत । ऐसा वर हर्षयुक्त । देतसें मीं त्या नरासी ।।२२।। देवेशादि तेव्हां म्हणत। गणाध्यक्षा नमन तुजप्रत । प्रसन्न जरी आम्हांवर सांप्रत । दृढ भक्ति तुझी सतत देई ।।२३।। कामासुराचा वध करावा । भयंकर जो असे सर्वां । स्थानभ्रष्ट केलें देवां । कर्मभ्रष्ट त्यानें मुनीश्वरांसी ।।२४।। म्हणून त्या असुराचें हनन । करी गजानना तूं बलसंपन्न । तथास्तु म्हणून अन्तर्धान । पावले तेव्हां गणनाथ ।।२५।। देव हर्षयुक्त होऊन । परतले वरदान लाभून । गिरिगुहांत बसले लपून । गणेशाच्या भजनीं रत ।।२६।। मुनि देवनायक शक्तिसहित । योग्य काळाची वाट पहात । तदनंतर कामासुर सभेंत । एकदा बैसला होता तैं ।।२७।। आकाशवाणी तो

ऐकत । भयदायक अत्यंत । कामासुरा ऐक वृत्तान्त । देवांनी प्रार्थिला मयूरेश्वर ।।२८।। तो ब्रह्म असे साक्षात । तुज ठार मारील निश्चित । त्यायोगें विश्व सुखयुक्त । करील विघ्नराजा तो ।।२९।। ही आकाशवाणी ऐकत । तैं तो असुर पडला मूर्च्छित । ती वाणी महाक्रूर अन्य दैत्यांप्रत । भयंकर ते सर्व आत्मे ।।३०।। महासुराजवळीं ते येती। महायत्नें त्यास सावध करिती । तैं तो कामासुर तयांप्रती । सांगे वृत्त आकाशवाणीचें ।।३१।। तें जाणून क्रोधपर । दैत्यवीर करिती विचार। देव आद्य शत्रू भयंकर । आमुचे ऐसें श्रुति सांगे ।।३२।। आम्हीं स्वामी आपणांसी । केलें होतें निवेदनासी । मारावें सर्व देवांसी । त्यांनी हें कृत्य दारुण केलें । ।।३३।। तरी आतां चिंता कां करिता । आपणा कैसी भयवार्ता । उत्पत्ति स्थिति संहारयुक्ता । अशक्य असे मारणें तुम्हां ।।३४।। महाभागा आम्हां आज्ञा द्यावी । देवहननाची संधि द्यावी । देव मरतां अनुभवावी । नि:सपत्न अवस्था सदा ।।३५।। त्यांचें ऐकून वचन। कामासुरें संमति देऊन । आज्ञापिलें करा देवकंदन । महा असुर तैं आनंदले ।।३६।। कुंभकर्णादि वीर जाती । गिरिकंदरीं काननीं शोधिती । मेरूगुहासंस्थ पाहती । देव ऋषिवृंदास तेव्हां ।।३७।। त्यांस ठार मारण्या टाकित । शस्त्रें ते दैत्य जयोद्यत । शिव मुख्य देव तैं स्मरत। मयूरेशासी भयभीत ।।३८।। दयासिंधो देवा यावें । आम्हां भयग्रस्तांस रक्षावें । त्यांनीं स्मरण करितां भक्तिभावें । धावला हेरंब मूषकध्वज ।।३९।। मयूरावर बैसून । शस्त्रधर प्रकटला प्रसन्न। तेजोराशिमय रूप तें पाहून । विस्मित देव स्तुति गाती ।।४०।। नाना स्तोत्रें ते म्हणती। गजानन तेज:पुंज त्यासी म्हणती । सुरर्षिजनहो मीं विकट जगतीं । भजा मजसी चिरकाल ।।४१।। कामयुक्त माया मयूरा। विविधात्मिका मीं रचिली रुचिरा । कामहीन मीं मज स्मरा । भजा

तुम्हीं कामनाशार्थ ।।४२।। मायासुखें देवेशांनो व्हाल । विकट तरी मज प्रिय विमल । माझें रूप अति सबल । पाहण्या समर्थ व्हाल तुम्हीं ।।४३।। त्याचें तें ऐकून वचन । सुरर्षि ते शोकमग्न । बळें चित्तनिरोध करून । निष्काम करिती आदरें ।।४४।। तेव्हां ते देव मुनि पाहत । गणेश्वरासी पुढ्यांत । त्यास प्रणाम करून स्थित । दैत्यशस्त्रें विद्ध ते ।।४५।। अति क्रोधपर तैं विकट सांगत । भयहीन व्हा आतां चित्तांत। माझ्या दर्शनें संरक्षणयुक्त । मुक्त तुम्हीं सर्वही ।।४६।। माझा अनुग्रह तुम्हांवरी । शस्त्रें घेऊनिया करी । जावें तुम्हीं युद्ध क्षेत्रीं । मी वधीन त्या कामासुरासी ।।४७।। हें आश्वासन लाभत । तेव्हां ते देवेंद्र शस्त्रयुक्त। दैत्यमुख्यांसवें लढत । तेजयुक्त विशेष ते ।।४८।। इंद्रे वज्राघात केला। तेव्हां कुंभकर्ण रणीं पडला । अन्य दैत्यसंघ भयभीत झाला । पळ काढिला तयानें ।।४९।। तो कुंभकर्ण राक्षसेश लाभत । दोन मुहूर्त जाता शुद्धि त्वरित । सावध होता तोही भयभीत । पळून गेला रणांतुनी ।।५०।। त्या वेळीं जय लाभून । देव गेले परतून । विकटास हर्षभरें प्रणाम करून। जयजयकारें स्तवन करिती ।।५१।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे षष्ठे खंडे विकटचरिते विकटप्रादुर्भावो नाम एकत्रिंशत्तमोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय एकतिसांवा संपूर्ण)